तात्काळ / अर्थसंकल्प प्राथम्य                                        सन २०२३-२४ मधील निधी वितरण.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र. ४०/अर्थ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २७ मार्च, २०२४.

वाचा:- शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०४ मार्च, २०२४.

परिपत्रक

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात सुधारित अंदाजाच्या मर्यादेत निधी वितरण व अर्थसंकल्पीय तरतूदींचे पुनर्विनियोजन याबाबतच्या सूचना उपरोक्त वाचा येथील दिनांक ०४ मार्च, २०२४ च्या शासन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. निधी वितरण व पुनर्विनियोजनाबाबतच्या नस्त्या आवश्यक तेथे नियोजन विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग या विभागांच्या मान्यतेनंतर वित्त विभागास बुधवार, दि. २० मार्च, २०२४ रोजी दुपारी ०२.०० वाजेपर्यंत स्वीकारण्यात येतील, यानंतर अशा बाबींचे प्रस्ताव / नस्ती वित्त विभागात कोणत्याही परिस्थितीत स्वीकारल्या जाणार नाहीत याची विभागाने नोंद घेवून त्यानुषंगाने कार्यवाही करावी, असेही सदर शासन परिपत्रकातील परिच्छेद क्र.७ मध्ये नमूद करण्यात आले आहे. असे असले तरी अद्यापही निधी वितरण व पुनर्विनियोजन या बाबींचे प्रस्ताव मोठ्या प्रमाणात वित्त विभागास प्राप्त होत आहेत. तसेच सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या शेवटी दिनांक २९, ३० व ३१ मार्च,२०२४ रोजी सार्वजनिक सुट्टी येत आहे.

२. उपरोक्त पार्श्वभूमीवर सर्व प्रशासकीय विभागांना या परिपत्रकान्वये सूचित करण्यात येते की, निधी वितरण तसेच पुनर्विनियोजन याबाबतच्या नस्त्या गुरुवार, दिनांक २८ मार्च,२०२४ रोजी दुपारी २.०० नंतर वित्त विभागात कोणत्याही परिस्थितीत स्वीकारल्या जाणार नाहीत.

तसेच वित्त विभागाच्या नोंदणी शाखेमध्ये किंवा व्यय शाखेमध्ये या बाबींचे प्रस्ताव उपरोक्त कालमर्यादेनंतर कोणत्याही परिस्थितीत स्वीकारण्यात येऊ नयेत.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२४०३२७१८२४४६६६०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PANDURANG JOTIBA JADHAV

Digitally signed by PANDURANG JOTIBA JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=476d37b83707d4fa8d081fe85145aa8df78154c98a1889573cd2900918d397e5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A256E2285AACFD4CDF1A5A468970133F213ECC0C01D84AA031BA50479F2EEF89, cn=PANDURANG JOTIBA JADHAV
Date: 2024.03.27 18:34:54 +05'30'

**(पां. जो. जाधव)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

४) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
५) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) सर्व सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सह सचिव / उप सचिव (नोंदणी शाखा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११०००१.
१०) प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
११) प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१२) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१६) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवड नस्ती, अर्थ-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.